सामान्य राज्य सेवा ( प्रशासन शाखा) गट-ब ,मधील अधिकाऱ्यांच्या सर्वसाधारण बदल्यामध्ये अंशत: बदल करण्याबाबत-अधिक्षक व तत्सम

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन आदेश क्रमांकः न्यायाप्र-२९१८/प्र.क्र.१६०/प्रशा-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक: ०१ ऑगस्ट, २०१८

वाचा:- १) शा.शि.व क्री.वि., शासन निर्णय.क्र.ईएसटी-३९१७/प्र.क्र.४६/प्रशा-२, दिनांक १७.०३.२०१७

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०१७/प्र.क्र.४१५/कार्यासन-१२ दिनांक ०९.०४.२०१८

३) शा.शि.व क्री.वि., शासन निर्णय क्र. बदली ३११८/प्र.क्र.१४/प्रशा-२, दि. १६.०४.२०१८ तसेच शासन शुध्दीपत्रक समक्रमांक, दिनांक २०.०४.२०१८ व दिनांक २५.०४.२०१८

४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन आदेश क्र.बदली ३११८/प्र.क्र.८५/प्रशा-२, दिनांक १८.०५.२०१८

**शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार दिनांक ३१ मे, २०१८ रोजी तीन वर्षाचा कालावधी पूर्ण करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या बदलीचे आदेश दिनांक १८.०५.२०१८ रोजी निर्गमित करण्यात आले आहेत. त्यामध्ये काही अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेत अंशत: बदल करण्याचा निर्णय शासन स्तरावर घेण्यात आला आहे. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीस अनुसरुन सक्षम प्राधिकाऱ्यांनी दिलेल्या मान्यतेनुसार खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांची बदलीने त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक- ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | नाव व पदनाम | दिनांक १८.०५.२०१८ अन्वये करण्यात आलेली पदस्थापना | सुधारीत पदस्थापना | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री. विशाल देशमुख, अधिक्षक, शा.पो.आ. पं.स. गोंडपिंपरी, जि. चंद्रपूर (अवघड क्षेत्र) | अधिक्षक, शा.पो.आ. पं.स. अहेरी, जि. गडचिरोली | अधिक्षक, शा.पो.आ. पं.स. चिमूर, जि. चंद्रपूर (बिगर अवघड क्षेत्र) | रिक्त पदावर |

२. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्विकारावा तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक-सीडीआर १०८२/२५६७/२८/ अकरा, दिनांक ३० ऑगस्ट १९९२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

३. आयुक्त (शिक्षण) पुणे यांनी या आदेशाप्रमाणे सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना तातडीने कळवावे व बदली झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होतील, याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्रमांक २०१८०८०१११५२४७८९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sport Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd5fc4fce5f6732e6657dca817ae6ee619a55d170d3c93eff53c3ca69d1a772d, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2018.08.02 11:13:51 +05'30'

(र. प्र. आटे)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण), शिक्षण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परीषद
३) सर्व शिक्षण संचालक
४) विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर
५) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
६) शिक्षणाधिकारी( प्राथमिक/माध्यमिक/निरंतर) जि.प. चंद्रपूर/गडचिरोली
७) संबंधित अधिकारी (आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालयामार्फत)

**प्रत माहितीसाठी,**

१) मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी.
२) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
३) निवडनस्ती.